पदोन्नती
**स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (गट-क) (२०% कोटा) यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) पदावर पदोन्नती व पदस्थापना.**

**महाराष्ट्र शासन.**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांक-पदोन्न-२०१८/प्र.क्र.५९/सेवा-३**
**मंत्रालय, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक : ०६/१०/२०१८**

## शासन आदेश

सन २०१६-२०१७ च्या निवड यादीतील सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेल्या स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (गट-क) (२०% कोटा) यांना कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) (गट-ब) (अराजपत्रित) पदावर रु.९३००-३४८०० या वेतन बँड (पीबी-२) मधील रुपये ४३०० या ग्रेड वेतनावर पदोन्नती देण्याचे शासन आदेश देत आहे. पदोन्नती नंतर संबंधितांची नियुक्ती परिशिष्ट "अ" मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत करण्यात येत आहे.

२. परिशिष्ट "अ" मध्ये नमूद कनिष्ठ अभियंता यांना देण्यात आलेली पदोन्नती ही पुढील अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

१. निवडसूची तयार करताना कोणताही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.
२. परिशिष्ट "अ" मधील अभियंत्यांविरूध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधिन राहून सदर पदोन्नत्या करण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याच्या विरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी चालू असल्यास त्याच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.
३. परिशिष्ट "अ" मधील मागास प्रवर्गातील अभियंत्यांनी (मूळ नियुक्ती बिगर मागास प्रवर्गात झालेले अभियंता वगळून ) जात वैधता प्रमाणपत्र शासनास सादर केले आहे, या धारणेच्या अधिन राहून सदर पदोन्नत्या करण्यात येत आहेत. तथापि, यापैकी एखादया अभियंत्याने जात वैधता प्रमाणपत्र शासनास सादर केले नसल्यास त्याच्याबाबतीत हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.
४. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय दिनांक ०२.०६.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित अधिका-यांनी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केल्याशिवाय संबंधित अधिका-याला पदोन्नती देऊ नये.
५. पदोन्नती होणारे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक (गट-क) यांना पदोन्नती देण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना, दिनांक २८.०४.२०१५, दिनांक १६.०७.२०१५ व दिनांक १५.०६.२०१७ अन्वये विभागीय संवर्गातील रिक्त पदांची संख्या विचारात

घेवून विभागीय संवर्ग वाटप करावयाचे आहे. विभागीय संवर्ग वाटप नियमावलीतील तरतुदीनूसार परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केलेल्या अभियंत्यांना विभागीय संवर्ग वाटप करण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतरची कनिष्ठ अभियंता पदावरील पदस्थापना करण्यात येत आहे.

६. पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निकालाच्या अधिन राहून भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब यांनी दिनांक २९.१२.२०१७ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिका-यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग / अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ प्रमुखांना अशी विनंती करण्यात येते की, परिशिष्ट "अ " मधील स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांना पदोन्नतीनंतर तात्काळ त्यांच्या पदभारातून मुक्त करावे व नविन नियुक्तीच्या ठिकाणी कमीतकमी पदग्रहण अवधी घेऊन रजेवर न जाता किंवा कोणत्याही प्रकारे नियुक्ती रद्द करण्याचे अभिवेदन न करता रुजू होण्याचे आदेश द्यावेत.

४. जर वरील अभियंता हे सदर आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत पदोन्नतीनंतर देण्यात आलेल्या नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही, असे गृहीत धरुन त्यांच्या पदोन्नतीचे आदेश कसलीही नोटीस न देता रद्द करण्यात येतील. याबाबत नंतर कोणत्याही अभिवेदनाचा विचार केला जाणार नाही, यांची संबधितांनी कृपया नोंद घ्यावी.

५. संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग / अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ प्रमुख यांना कळविण्यात येते की, परिशिष्ट "अ " मध्ये नमूद केलेले अभियंते पदोन्नतीच्या कनिष्ठ अभियंता पदावर १ महिन्याच्या आत हजर न झाल्यास त्यांची नावे शासनास कळवावीत. जेणेकरुन परिच्छेद ४ मध्ये नमूद केल्यानुसार शासन स्तरावर पुढील कार्यवाही करणे शक्य होईल.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्तळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००६१२४२०६४११८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shruti S Toraskar

Digitally signed by Shruti S Toraskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bca41432a777580b8ba1c6614e925717ceeeace2c66bbd0607d78190d1481fd9, serialNumber=0802ff350e58441377c557550f9614927ef1ba52928bd811a654aa627da6941c, cn=Shruti S Toraskar
Date: 2018.10.06 12:43:55 +05'30'

**( श्रुती तोरस्कर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर

२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई पत्राने
३. प्रधान सचिव (सा.बां.विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री (सा.बां.) / मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
८. उप सचिव (सं.नि.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. संबंधित स्थापत्य अभियांत्रिकी सहायक यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे मार्फत.
१०. कार्यासन अधिकारी (आस्था-१/सेवा-२/आस्था-३/सेवा-६), सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
११. कार्यासन सेवा-३ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.

## शासन निर्णय क्र.पदोन्न-२०१८/प्र.क्र.५९/सेवा-३, दिनांक ०६/१०/२०१८ सोबतचे परिशिष्ट-अ
## स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावरून कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) पदावर पदोन्नती व पदस्थापना

| अ.क्र | स्थापत्य अभियांत्रिकी सहायकाचे नांव | उमेदवाराचा प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | विभागीय महसुली वाटप | कनिष्ठ अभियंता पदावर पदोन्नती दिल्यानंतर करण्यात येत असलेली पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.व्ही.आर.मिसाळ | भ.ज.(ब) | खुला | नाशिक | सा.बां.विभाग नंदूरबार. |
| २ | श्री.एस.जी.कलशेट्टी | इ.मा.व. | खुला | पुणे | सा.बां.उपघटक क्र.१,सोलापूर. |
| ३ | श्री.शिवाजी पी.गुरव | इ.मा.व. | खुला | औरंगाबाद | सा.बां.उपविभाग (इमारती),हिंगोली. |

Shruti S Toraskar

Digitally signed by Shruti S Toraskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bca41432a777580b8ba1c6614e925717ceeeace2c66bbd0607d78190d1481fd9, serialNumber=0802ff350e58441377c557550f9614927ef1ba52928bd811a654aa627da6941c, cn=Shruti S Toraskar
Date: 2018.10.06 12:44:20 +05'30'

( श्रुती तोरस्कर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन